# माझ्या आठवणीतील इस्लामपुर




इस्लामपुरातील नुतन मराठी शाळेत इयत्ता चौथीपर्यंत लांबलचक पाटावर मांडी घालून बसावे लागे. दप्तर पाटाखाली सरकवून ठेवायला सोय होती. दशम पद्धती लागू झाली असल्याने इंच, फूट, यार्ड, मण, शेर, छटाक

यांची सद्दी संपून मीटर आणि लिटरची मापे वजने यांचे तौलनिक तक्ते भिंतींवर नवेपणा राखून होते. आणे, पै यांची रोकडवहीतून हद्दपारी झाली होती. शंभर नवा किंवा नया पैसा म्हणजे नवा एक रुपया किराणा दुकानात, भाजीबाजारातील हिशोबात बस्तान बसवायला काळ लोटला तरी नवाच राहिला होता.

चौथीच्या स्कॉलरशिपसाठी नदाफ गुरूजींच्या शिकवणीला मी जात असे. पाचवीत गेलो अन स्टेज्ञ बदलले. हायस्कूलच्या बेंचवर आरूढ होऊन सायन्सच्या पीरियड्सला प्रयोगशाळेतील चंबू, नसराळी, रबरी नळ्या, मोरचूद, क्लोरिक ॲसिड अशा सॉलिड द्रव्य, पदार्थाचे दर्शन झाले. प्रत्येक तासाला नवे ' सर' येऊन कॅटलॉगमधून प्रत्येकाच्या नावाचा पुकारा दररोज का करतात ते मला कधीच समजले नाही. शिवाय माझी आई पाचवी ते सातवीच्या वर्गाला मराठी आणि हिंदी

विषयाची शिक्षिका म्हणून होती. एक बरे होते ती माझ्या तुकडीला शिकवत नसे! हनुमानाच्या चेहऱ्याचे सदैव संघाच्या खाकी चड्डीत वावरणाऱ्या एका रागीटसरांकडे पहायला मला भिती वाटे व ते आईशी बोलायला लागले की माझ्याकडे पहात. तेंव्हा मी आईच्या हाताला धरून असे. त्या सीडी देशपांडे सरांनी माझ्या आईला इंग्रजी शिकवले व तिला मॅट्रिकला त्या विषयात पास व्हायला धीर दिला होता. नंतर एकदा आई पुण्यातील वृद्ध निवासात असताना इस्लामपूरच्या आठवणीत रमताना म्हणाली होती, 'अरे तू पोटात होतास तेंव्हा मी मॅट्रिकची परीक्षा देत होते!'

माझ्या इस्लामपुरच्या मित्रात विद्याधर कुलकर्णी, जयंत फडके, गुबगुबीत यष्टीचा दिलीप सोनटक्के, नाजुक प्रकृतीचा अशोक सव्वाशे, बुटका सुनील जोशी असे काही होते. कधी अभ्यासासाठी एकत्र तर कधी आईच्या



**मैत्रिणींबरोबर गेल्यावर झालेल्या ओळखीतून जवळीक वाढली.**




**आम्ही संभाजी चौकात माळवदे यांच्या दुमजली घरात राहायला गेलो तसे तिथले मित्र राजेन्द्र तोडकर-माळी, त्याचे वडील शिराळा पेटा-तालुक्यापेक्षा लहान विभागाचे मुख्य थोडक्यात मामलेदाराच्या हुद्द्यावर होते. तो आईला**

'पा' म्हणायचा. कदाचित ती सावत्र असल्याने तसे असेल असे आता वाटते. त्यांच्या काळ्या कौलारू घराला सोपा होता. पुढच्या काही खोल्यांमध्ये कंडक्टर, शाळा मास्तर वगैरे एकांडे लोक रूम शेयर करून राहात असत. त्यात एक कदम म्हणून होते, केसांचा फुगा, गोरटेले ते सारखे एकच एक चित्र काढून रंगवताना दिसत. राजेन्द्रचे मोठे भाऊ रेडिओ सिलोन लाऊन बसत. बुधवारी बिनाका गीत माला ऐकायला कान देऊन ऐकताना पाहून ‘पा’ त्याचा राग राग करत असत. त्याची ताई कवठेमहांकाळ अशा लांबलचक नावाच्या गावात नांदायला गेली म्हणजे परदेशी गेली असे मला तेंव्हा वाटत असे. त्यांच्या घरी चोरून जावे लागे. कारण वाटेत तापट मोगऱ्या नामक कुत्रा सदैव भुंकायला तत्पर असे. त्याच्यामुळे इंजेक्शन घ्यायला लागलेले महाभाग असल्याचे ऐकून आम्ही तर काय टरकून असायचो. काही

काळानंतर तो माझ्याकडे पाहून पुच्छ हालवायला लागला नंतर तर आमच्या इशाऱ्यानिशी तो इतरांवर भुंकायला जायला लागला.




आधी आम्ही गांधी चौकातून पंड्या चौकाकडे जाणाऱ्या वाटेवर खूप उंच व डौलदार लिंबाच्या झाडापाशी असलेल्या तिमजली इमारतीत पहिल्या मजल्यावर राहात असू. रामनामे यांच्या घराची इमारत तिथून समोर दिसे.

त्या ठिकाणी शेजारच्या तिमजली इमारतीत शहा म्हणून सधन कुटुंब राहात होते. गोऱ्यापान गुबगुबीत अंगकाठीच्या गुजराथी पद्धतीने साडीचा पदर घेतलेल्या भाभी त्यावयात मला तेंव्हा फार आवडत. मात्र त्यांच्या घरी कोणी एक नातलग येत त्यांच्यापैकी एका समजत्या वयाच्या मुलाला चड्डी न घालायचे वेड होते. वर फक्त सदरा आणि हातात बैलगाडीवानांच्या हाती असलेला चाबुक या आवेशात तो सदैव असे! तो रस्त्यावर उतरून हातातला चाबूक उगारून जाणाऱ्या येणाऱ्यांची तारांबळ उडवायचा! मोठे मोठे लोकही त्याला टरकून रस्ता बदलून जात असत. मोठ्याने काही बाही बोलत तो रस्त्यावर चांगलाच उच्छाद मांडत असे. मला आमच्या गॅलरीतून ती पहायला मौज वाटे.

राजेन्द्र माळी शिवाय मला तिथे बाबू, रामू हे शेजारच्या मठात राहणारे सवंगडी झाले. विश्वनाथ बोंगाळे आणि



त्यांच्या घरातील सदस्यांनी माझ्या भाषा ज्ञानात शिव्यांची भर घातली. शारिरीक अवयवांना कसे रंगदार नातेसंबंध द्यावेत, त्याचे वस्तुपाठ ते नित्य नियमाने देत. व्यवसाय शिंप्याचा म्हणून कदाचित तोंडाची कैची कराकरा चालवून ते सर्व कुटुंबिय घरगुती समस्या रस्त्यावर येऊन भांडत. शिवाय सार्वजनिक नळ त्यांच्या घरासमोर असल्याने घागरीतून पाणी आणि मुखातून शिव्या हे परिचित दृश्य अजूनही डोळ्यासमोर येते.

त्या बालपणात माझे वडील भाड्याची सायकल घेऊन हँडलला छोट्यामुलांची सीट लावून फिरायला नेत. पहिली बारी लताची मग माझी असे ठरलेले. मला नंतर फिरवलेले तरी चाले कारण मला ते पेठनाक्यापर्यंत लांबवर घेऊन जायचे. वाटेत त्यांच्या ओळखीचे कोणी भेटले की मग माझा फेरफटका तिथेच संपायचा. इस्लामपुरात त्यावेळी दोन थेटरे होती. पैकी मोहन



टॉकीज माझ्या वडिलांचेच होते पण तिथे कोर्ट केसमुळे आता आम्हाला जायची शक्यता नव्हती.



पण जयहिन्द टॉकीजमधे बाल्कनीत बसून राजतिलक, तूफान और दिया, सुवर्णसुंदरी असे सिनेमे पाहिल्याचे आठवते. सिनेमा चालू व्हायच्या आधी विविध रेकॉड्र्स लावायची प्रथा असल्याने छोटागंधर्वांचे ‘दिलरुबा मधुर हा... जिवाचा’ हे गाणे ऐकून ऐकून कान किटायचे. नंतर

फिल्मडिव्हीजनची न्यूजची रिळे मग सिनेमा चालू होई. मध्यंतर तीन वेळा होई. कारण मशीनवरील एक स्पूल संपले की दुसरे चढवून होई तोवर वेळ जात असे. शिवाय जुनी फिल्म असायची तेंव्हा तुटली की ती जोडायला नेलपॉलिश सारख्या वासाचे सोल्यूशन लावून जोडेपर्यंत पिटातील पब्लिकच्या कर्कश्य शिट्ट्यारूपी शिव्यातील नाराजी झेलायला लागे. पुढे बँड व मागे ढकलगाडीला दोन्ही बाजूला चालू सिनेमाचे नाव, कलाकार, सायं साडेसहा व रात्रौ साडेनऊ असे खेळाच्या वेळा वगैरे दर्शवणारे बोर्ड वाचत वाचत रहदारीचे रंजनही होत असे. क्वचित प्रसंगी काही नाच करणारे ही असत. त्या सिनेपाट्या रंगवायचे चाललेले काम मी मोहनटॉकीजच्या आवारात आल्यापासून पहात आलो होतो. त्यावेळचे पेंटर मगदूम व तांबोळी आर्टस



वाले कलाकार म्हणजे मला दैवत वाटायचे. झाशी की रानी व गजगौरी सिनेमे जोरात चालले असावेत कारण त्यांच्या जाहिरातीसाठी बनवलेल्या ढाली व तलवारी आमच्याकडे बरेच बर्षे पडून होत्या. माझा एक विजय नामक चुलत भाऊ होता त्याच्यासाठी आमच्याकडे तेंव्हा क्रिकेटच्या स्टंपा, बॉल वगैरे साहित्य हाताळायला मिळे. आमच्या घराच्या समोर सबनीस फोटो स्टूडिओ होता. त्याचे मालक आमच्याकडे फोटोसेशन करायला येत. ते 'विच्छा माझी' फेम वसंत सबनिस त्यांचे भाऊ होते असे नंतर एकदा वडिलांनी आवर्जून सांगितले होते. तसेच पंडित भीमसेन जोशी इस्लामपुरातील चव्हाण सायकल मार्टमधून भाड्याने सायकल घेऊन फिरताना वडिलांनी कोणाकोणाला दाखवले असत. क्रिकेटर मधु गुप्तेचे वडील मेडिकल रेप असावेत कारण ते टाय बांधलेले एकमेव पाहुणे कधी कधी 'जन्याकडे' म्हणजेच



आमच्याघरी यायचे. इस्लामपुरला पाण्याचे दुर्भिक्ष म्हणून लाकडी गाड्यातून घागरी भरून विकायचा धंदा करणारे भिस्ती तेंव्हा असत. मुडीसचा चहा ढकलगाडीतून नेताना मजा वाटे. आमच्याकडे खूप फोटो व मोठा अलबम होता. पुढे एका पोस्टींग नंतर काही लाकडीपेट्यांना वाळवी लागल्याने त्यातील सामान न उघडता त्याला रॉकेल घालून आग लावून द्यायला लागली त्या जळितात ते सर्व फोटो नष्ट झाले. असो.

डॉ. बाळासाहेब वैद्य, स्वामींच्या सानिध्यामुळे आमच्याकडे कारने ते येत. त्याचे मला फार अप्रूप वाटे. शिवाय डॉ. वसंतराव चिटणीस म्हणून आणखी एक दादांचे वल्ली मित्र होते. पायात सपाता घालून चिटणीस वहिनी अंड्यांच्या विविध रेसीपी बनवायच्या. त्याचा शंकर नामक कंपौंडर हातात पिशवी घेऊन मटन आणणार, मग रस्सा, खीमा पोळ्यावर ताव मारताना, नळी कशी



चोखायची याचे प्रात्यक्षिक करून घेत मी झणझणीत मेनू चाखायचो. वडील डॉक्टरांबरोबर सिगरेटचे कश घेत तेंव्हा आईच्या चेहऱ्यावर लटका राग असे. या डॉक्टरांची लफडी होती हे मला त्या वयात माहित होते. एक मोलकरीण तर एक मुसलमानबाई फी न देऊ शकल्याने जवळीक साधून होती. ज्या जयवंत घराण्यातील शोभना समर्थ, नलिनी, नुतन, तनुजा अशा सौंदर्यवान मुली नातलग अशा चिटणीसवहिनी ते सर्व कर्म म्हणून डोक्याला हात लावून पहात असत. त्यांचे पंड्याचौकातील घर असे मजेशीर होते की फक्त 12 फुटाच्या रुंदीच्या बांधकामात तीन लाकडी मजले पत्याच्या बंगल्या प्रमाणे वाटत. शिवाय दोन उंच मजल्याला जोडणारा दहा फुटाच्या अंतरासाठी चिंचोळा अरुंद पूल होता. अनेकांना तो पार करायला जरा दडपण यायचे. मी लहान असूनही त्यावरून पटकन जाई याचे



कौतुक डॉ. चिटणिसांना असे म्हणतात. त्यांच्याकडे एक मॉरिस टाईप पिटुकली कार होती. डॉक्टर एक तर दवाखान्यात असत नाहीतर या कारखाली झोपून काहीतरी दुरुस्ती करताना अनेकदा दिसत. त्या गाडीतून सर्वांना फिरवून आणायची त्यांना भारी हौस. ‘जन्या, मंगलाला घेऊन ऐतवड्याला पेशंटला बघायला घेऊन जाऊ’. म्हणून आम्ही गेलो व परतताना नेमकी गाडी बंद पडली. बॅटरीच्या प्रकाशात त्यांनी काहीतरी लटपटी करून ती चालू करून घरी सोडले तेंव्हापासून आईने त्यांच्या कारकडे पहाणे देखील सोडले असावे. आणखी एक डॉक्टर होते फडके मामा. ते होते नाटकप्रेमी. त्यांनी बसवलेल्या कुलवधू नाटकात आईने काम केले होते. खेळ आमच्या मोहनटॉकीजमधे झाला होता. तेंव्हा किंवा असेच केंव्हातरी एकदा मला उभ्या माईकच्या उंची पर्यंत बखोट्या पकडून लटकलेल्या अवस्थेत मी गीतेचा 12वा



अध्याय पाठ म्हणून शाबासकी मिळवली होती. एका दिलीप मधूकर पंडितराव नावाच्या मित्रामुळे मला क्रिकेटची बॅट हाती धरायला शिकायला मिळाले. ओरडून टाईम प्लीज असे म्हणायचे म्हणजे क्रिकेट आले असा तेंव्हा खाक्या होता. संभाजी चौकात पाण्याच्याधारेने आट्यापाट्या, खोखो, हुतूतूचे अंगण ठरवले जायचे. मग मोठ्यामुलांचा खेळ रंगायचा. सर्कस आलेल्या शेतात जुन्या एस्टीस्टँडच्यावाटेवर वर्दळ माजे. शनिमंदिर आणि अन्य तलावातील शेवाळे साचलेले पाणी व त्यात आडव्याहाताने ठिकऱ्यामुळे वर्तुळे काढायचा खेळ रंगत असे. कंचे, भोवरे, सिगरेटची वापरलेली पाकिटे, काड्याच्या पेट्याची वरची चित्रे वट्ट्याच्या चपट्यादगडाने किंवा फरशीने आखलेल्या चौकोना बाहेर उडवून चवड जिंकायची म्हणजे तेंव्हाचे भूषण असे. असा गठ्ठा बाळगून असणे हे बालश्रीमंतीचे लक्षण होते. खोखोत



जरा चकवायचे कसब होते. बाकी खेळात मी मध्यम वकूबाचा खेळाडू होतो. पत्त्याच्या खेळातील इशारे, कुठे डोके खाजव, तर कधी एकदम खोकला काढ, डोळा मार दुसऱ्याच्या हातातील पानात डोकाव, कॅरमच्या बोर्डावरील सोंगट्या डोळा चुकवून मुद्दाम हालवून पॉकेटपाशी सरकव, अशी हातचलाखी, फाजीलपणे मला भावले नाहीत.



शनि मंदिर व अन्य वास्तूंचे गूगलवरून घेतलेले दर्शन

त्या काळात विठ्ठल मंदिरात वाठारकरबुवांचे कीर्तन आवडे. राममंदिरापाशी औंधकर सराफांचा दरारा होता. नुतन मराठी शाळेसमोर शनिमंदिर, यल्लम्मा तळे व मंदिरात कमी वेळा जायला मिळाले.




अष्ट्याच्या नाक्यावर विवस्त्र फिरणारे धोंडीबाबा अनेकांचे दैवत होते.








त्याच्या जवळ शंभू अप्पाचा मठ आणि वार्षिक उरुस त्यातील पाळणे, मौत की कुवा, त्यातील आकर्षणे होती. सायकलची रीम व त्यावर रबरी धाव असलेल्या चाकाला हाताने थपडा देत पळवायला मजा वाटे. चकरा मारत मारत न कळत गल्ली बोळात काय काय चालते याची उजळणी होत असे. घोंगडी बनवताना ते लोकरीचे धागे चिंचोक्याच्या खळीत बुडवलेले, मोठ्या ब्रशने ती खळ लांबवर ताणून लावलेल्या धाग्याला लावताना येणाऱ्या उग्र वासाचा गंध, कांडपमिशिनीवर उडणारा मिरच्यांचा खाट, ऐरणीवर लाल भडक लोखंडाचा तुकडा

हातोड्यांचा मार खात पातळ होता होता लागलेल्या घामाच्या धारा. कल्हई लावताना एका हाताने चामड्याचा भाता हाताने दाबून दुसऱ्या बाजूला तापलेल्या भांड्याला नवसागराची भुकटी टाकून केलेल्या धुरात कथिलाच्या काडीचे टोक विरघळवून ते हलक्या हाताने फडक्याने पुर्ण भांडेभर पसरवून पितळेच्या भांड्याला पाण्यात बुचकळवून चुर्र आवाज काढून शुभ्र तकाकी आणलेली किमया, बैलांना काढण्या घालून ते खाली पाडून चारी पाय एकत्र बांधून जुन्या नालांना खरवडून काढून आधीच्या खिळ्यांना पकडीने काढून नवे कोरे नाल खुरांना ठोकून झाल्यावर धडपडत उभे होताना व नंतर नवे बूट पावलावर चढवले की नवेपणा आपल्याला जसा जाणवतो. कदाचित तसाच आनंद त्यांना ही वाटत असेल काय? ही बालमनावर ठसलेली चित्रे उराशी बाळगून मी १९५९ सालच्या मे महिन्यात इस्लामपूर



सोडून माधवनगरशी जवळीक साधली.

(रम्य ते बालपण या लेखातून उद्धृत)

लेखन काल २०२० ते २०२२.

भविष्यकाळात कधीतरी माझे जुने मित्र फोटोतून भेटले तर त्यांचेसाठी ही जागा रिझर्व केली आहे...!



विश्वनाथ बोंगाळे स्टूडिओतील माझे चित्र